राज्यातील प्राविण्यप्राप्त खेळाडूंना शासकीय निमशासकीय व इतर क्षेत्रात नोकरीसाठी ५% आरक्षण

सर्व समावेशक सूचना.

महाराष्ट्र शासन

शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

शासन शुद्धीपत्रक क्रमांक: राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय विस्तार भवन,मुंबई-४०००३२

दिनांक: २४ ऑक्टोबर,२०१९

वाचा:

१. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक: राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२ , दिनांक ०१ जुलै,२०१६.
२. शासन शुध्दीपत्रक, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक: राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दिनांक १८ ऑगस्ट,२०१६.
३. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक : संकीर्ण १७१७/प्र.क्र.३९/क्रीयुसे-२ , दिनांक १७ मार्च, २०१७.
४. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक : संकीर्ण १७१७/प्र.क्र.३९/क्रीयुसे-२ , दिनांक २७ मार्च, २०१७.
५. शासन शुध्दीपत्रक, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक: राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दिनांक १० ऑक्टोबर, २०१७.
६. शासन शुध्दीपत्रक, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक: राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दिनांक १५ नोव्हेंबर,२०१७.
७. शासन शुध्दीपत्रक, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक: राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दिनांक १६ नोव्हेंबर,२०१७.
८. शासन शुध्दीपत्रक, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक: राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दिनांक ११ मार्च,२०१९.

शुद्धीपत्रक:

उपरोक्त संदर्भाधिन शासन निर्णयान्वये, राज्यातील प्राविण्यप्राप्त खेळाडूंना शासकीय, निमशासकीय व इतर क्षेत्रात नोकरीसाठी ५% आरक्षणाच्या सर्व समावेशक सूचना देण्यात आल्या आहेत उक्त क्रमांक १ च्या शासन निर्णयातील परिच्छेद ५ मध्ये क्रीडा प्रमाणपत्र वैधता पडताळणी करण्याची कार्यपद्धती विशद करण्यात आली आहे. तथापि,सदरच्या कार्यपद्धतीमुळे उद्भवलेल्या प्रकरणांवर मा.न्यायालयात दाखल याचिकांवर मा.न्यायालयाने दिलेल्या न्यायनिर्णयाच्या अनुषंगाने संदर्भाधीन दिनांक ११ मार्च,२०१९ च्या शासन शुद्धिपत्रकान्वये सुधारणा करण्यात आल्या आहेत. आता परीक्षा पद्धतीमध्ये सुलभता येण्याच्या दृष्टीने खालील प्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

२. संदर्भाधीन दिनांक ११ मार्च, २०१९ च्या शासन शुद्धिपत्रकातील परिच्छेद क्रमांक ३ (I) "संबंधित खेळाडूने करावयाची कार्यवाही:-

साधारणपणे खेळाडूने खेळविषयक प्रमाणपत्र मिळाल्यानंतर सदरचे प्रमाणपत्र छाननी करण्यासाठी खेळाडू ज्या विभागात वास्तव्यास आहे,त्या विभागीय उपसंचालक,क्रीडा व

युवक सेवा यांच्याकडे पाठवावे. मात्र परीक्षार्थी खेळाडू उमेदवाराने, संबंधित पदाच्या निवडीकरिता पूर्व परीक्षा अथवा मुख्य परीक्षेचा अर्ज सादर करावयाच्या दिनांकाआधी किंवा एकाच टप्प्यावर आयोजित केल्या जाणाऱ्या परीक्षेसाठी सादर करावयाच्या अर्जाच्या अंतिम दिनांकाआधी, तो ज्या क्रीडा विभागात वास्तव्यास आहे त्या विभागातील संबंधित उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा यांच्याकडे प्रमाणपत्र पडताळीसाठी अर्ज सादर केलेला असणे बंधनकारक आहे. तसेच खेळाडूने कोणत्या विभागातील उपसंचालक,क्रीडा व युवक सेवा यांच्याकडे प्रमाणपत्र पडताळणीसाठी अर्ज सादर केला आहे हे आवेदन अर्जात नमूद करणे तसेच त्याची पोच पावती सोबत जोडणे बंधनकारक आहे. उपसंचालक,क्रीडा व युवक सेवा यांच्याकडून आधीच प्रमाणपत्र पडताळणी करून घेतलेल्या उमेदवारांनी प्रमाणपत्र पडताळणी अहवालाची प्रत सोबत जोडणे आवश्यक राहील. ज्या पदांवरील निवडीसाठी उमेदवाराची मुलाखत घेण्यात येते अशा पदांच्या मुलाखतीवेळी संबंधित खेळाडूकडे क्रीडा प्रमाणपत्राच्या पात्रतेचा अहवाल असणे बंधनकारक आहे." **या ऐवजी**

"<u>संबंधित खेळाडूने करावयाची कार्यवाही:-</u>

साधारणपणे खेळाडूने खेळविषयक प्रमाणपत्र मिळाल्यानंतर सदरचे प्रमाणपत्र छाननी करण्यासाठी खेळाडू ज्या विभागात वास्तव्यास आहे,त्या विभागीय उपसंचालक,क्रीडा व युवक सेवा यांच्याकडे पाठवावे. मात्र परीक्षार्थी खेळाडू उमेदवाराने, संबंधित पदाच्या निवडीकरिता दोन किंवा त्यापेक्षा जास्त टप्प्यांवर आयोजित केल्या जाणाऱ्या परीक्षेसाठी पूर्व परीक्षेचा अर्ज सादर करावयाच्या अंतिम दिनांकाआधी किंवा एकाच टप्प्यावर आयोजित केल्या जाणाऱ्या परीक्षेसाठी अर्ज सादर करावयाच्या अंतिम दिनांकाआधी तो ज्या क्रीडा विभागात वास्तव्यास आहे त्या विभागातील उपसंचालक,क्रीडा व युवक सेवा यांचेकडे प्रमाणपत्र पडताळणीसाठी अर्ज सादर केलेला असणे बंधनकारक आहे. तसेच खेळाडूने कोणत्या विभागातील उपसंचालक,क्रीडा व युवक सेवा यांच्याकडे प्रमाणपत्र पडताळणीसाठी अर्ज सादर केला आहे हे आवेदन अर्जात नमूद करणे तसेच त्याची पोच पावती सोबत जोडणे बंधनकारक आहे. उपसंचालक,क्रीडा व युवक सेवा यांच्याकडून आधीच प्रमाणपत्र पडताळणी करून घेतलेल्या उमेदवारांनी प्रमाणपत्र पडताळणी अहवालाची प्रत सोबत जोडणे आवश्यक राहील. ज्या पदांवरील निवडीसाठी उमेदवाराची मुलाखत घेण्यात येते अशा पदांच्या मुलाखतीवेळी संबंधित खेळाडूकडे क्रीडा प्रमाणपत्राच्या पात्रतेचा अहवाल असणे बंधनकारक आहे अन्यथा सदर उमेदवार, खेळाडू आरक्षणासाठी पात्र ठरणार नाही. खेळाडू उमेदवाराने कोणतीही बनावट कागदपत्रे सादर केल्याचे आढळून आल्यास अशा उमदेवाराविरुध्द फौजदारी कारवाई करण्यात येईल." असा वाचावा.

३. संदर्भाधीन दिनांक ११ मार्च,२०१९ च्या शासन शुद्धिपत्रकातील परिच्छेद क्रमांक ३ (IV)

"<u>शासनाच्या विविध विभागांच्या निवड प्राधिकाऱ्यांनी / महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने करावयाची कार्यवाही :-</u>

खेळाडू प्रवर्गातून प्राप्त झालेल्या अर्जासोबत योग्य त्या क्रीडाप्राधिकरणाने निर्गमित केलेले क्रीडा प्रमाणपत्र अथवा सदर प्राधिकरणाकडे क्रीडा प्रमाणपत्र पडताळणीकरिता केलेल्या

अर्जाची पोचपावती सादर केली नसल्यास परीक्षेच्या पहिल्या टप्प्यातच अर्ज नाकारण्यात यावेत.तसेच परीक्षेसाठी खेळाडू प्रवर्गातून अर्ज सादर केलेल्या उमेदवारांपैकी काही खेळाडू भविष्यात खेळाडू प्रवर्गासाठी अपात्र ठरण्याचा संभव लक्षात घेता खेळाडू प्रवर्गातील पदसंख्येपेक्षा पुरेशा अतिरिक्त उमेदवारांची गुणानुक्रमाने निवडीच्या व उपसंचालकांच्या प्रमाणपत्र पडताळणीच्या अहवालाच्या अधीन राहून तात्पुरती निवड करण्यात यावी. ज्या पदांवरील निवडीसाठी उमेदवाराची मुलाखत घेण्यात येते अशा पदांच्या मुलाखतीवेळी संबंधित खेळाडूकडे क्रीडा प्रमाणपत्राच्या पात्रतेचा अहवाल असणे बंधनकारक आहे.निवड प्राधिकाऱ्यांनी खेळाडू प्रवर्गातील नियुक्तीसाठी पात्र असल्याबाबत खेळाडूने आवेदन अर्जासोबत सादर केलेल्या सर्व माहितीसह परीक्षेचा निकाल संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्यांना कळवावा.” **या ऐवजी**

“शासनाच्या विविध विभागांच्या निवड प्राधिकाऱ्यांनी/महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने करावयाची कार्यवाही :-

“खेळाडू प्रवर्गातून प्राप्त झालेल्या अर्जासोबत योग्य त्या क्रीडाप्राधिकरणाने निर्गमित केलेले क्रीडा प्रमाणपत्र अथवा सदर प्राधिकरणाकडे क्रीडा प्रमाणपत्र पडताळणीकरिता केलेल्या अर्जाची पोचपावती सादर केली नसल्यास परीक्षेच्या पहिल्या टप्प्यातच अर्ज नाकारण्यात यावेत. ज्या पदांवरील निवडीसाठी उमेदवाराची मुलाखत घेण्यात येते अशा पदांच्या मुलाखतीवेळी संबंधित खेळाडूकडे क्रीडा प्रमाणपत्राच्या पात्रतेचा अहवाल असणे बंधनकारक आहे.निवड प्राधिकाऱ्यांनी खेळाडू प्रवर्गातील नियुक्तीसाठी पात्र असल्याबाबत खेळाडूने आवेदन अर्जासोबत सादर केलेल्या सर्व माहितीसह परीक्षेचा निकाल संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्यांना कळवावा.” असा वाचावा.

४. शासनाने उपरोक्त प्रमाणे केलेल्या सुधारणा या सदर शासन शुद्धिपत्रकाच्या दिनांकापूर्वी विविध परीक्षा, ज्या टप्प्यांवर आहेत त्या लगतच्या पुढील टप्प्यासाठीही लागू राहतील.तथापि ज्या पदभरती प्रक्रियांचे अंतिम निकाल जाहीर झाले आहेत अशा प्रकरणांमध्ये सदर तरतुदी लागू राहणार नाहीत.

५. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१०२४१५४१४५४३२१ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2019.10.24 15:46:42 +05'30'

**(इ.मु.काझी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
२. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
३. आयुक्त, क्रीडा व युवकसेवा,महाराष्ट्र राज्य,पुणे
४. सर्व मंत्रालयीन विभाग

५. सर्व मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील कार्यालय प्रमुख/विभाग प्रमुख
६. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
७. सर्व शिक्षणाधिकारी, जिल्हा परिषद
८. सर्व उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा, महाराष्ट्र राज्य
९. महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय,मुंबई
१०. सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी
११. निवड नस्ती, क्रीयुसे-२